**श्री. राजेश शांताराम गायकवाड, पोलीस नाईक, पोलीस आयुक्त बृहन्मुंबई कार्यालय, यांच्याकरीता पोलीस नाईक संवर्गात एक अधिसंख्य पद निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१२२३/१९१५/प्र.क्र.१११०/पोल-५ब,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक - २१ मार्च,२०२४.

**वाचा :-** १) पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई यांचा दिनांक ०५.१२.२०२३ रोजीचा प्रस्ताव.

२) दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ मधील कलम २०(४).

३) अधिष्ठाता,सर.जे.जे.समूह रुग्णालय, मुंबई यांचे दि.२०.११.२०२३ रोजीचे प्रमाणपत्र.

४) उच्चस्तरीय सचिव समितीची चक्रीय पध्दतीने घेण्यात आलेली मान्यता.

**प्रस्तावना :**

श्री.राजेश शांताराम गायकवाड, पोलीस नाईक /३१६८२, कार्यरत वनराई पोलीस ठाणे,मुंबई हे दिनांक २६.०७.१९९३ पासून शासकीय सेवेत कार्यरत आहेत. श्री.गायकवाड हे पोलीस नाईक पदावर एस-९ (२६४००-८३६००) या वेतनश्रेणीत वेतन घेत आहेत. श्री.गायकवाड हे शासन सेवेत कार्यरत असताना नसा डॅमेज झाल्याने व कंबरेपासून ८० टक्के अपंगत्व आल्याने दिनांक ०६.१०.२०२१ पासून रुग्णनिवेदनात आहेत. अधिष्ठाता, सर जे.जे. समूह रुग्णालय, यांच्याकडून श्री.गायकवाड यांना ८० टक्के अपंगत्वाचे प्रमाणपत्र देण्यात आले आहे. पोलीस नाईक पदाला समकक्ष पद पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयात उपलब्ध नसल्याने श्री.गायकवाड यांचेसाठी अधिसंख्य पद निर्माण करण्यासंदर्भातील प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला आहे.

दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ मधील कलम २०(४) अन्वये सेवेत कार्यरत असताना दिव्यांगत्व आल्यास कर्मचा-यास त्याच्या दिव्यांगत्वानुरुप सुयोग्य पदावर पदस्थापना दिली जाईल व मूळ धारण करत असलेल्या पदाचे वेतन संरक्षण दिले जाईल. सदर पद उपलब्ध नसल्यास कर्मचा-यास दुसरे सुयोग्य पद उपलब्ध होईपर्यंत किंवा त्याच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदनिर्माण करुन त्यावर पदस्थापना दिली जाईल, अशी तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूद विचारात घेऊन श्री.राजेश शांताराम गायकवाड, पोलीस नाईक यांच्याकरीता सेवासंरक्षणासहीत सर्व लाभ देण्याकरीता पोलीस नाईक या संवर्गातील एक अधिसंख्य पद दिनांक ०६.१०.२०२१ पासून ते त्यांच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत अथवा अन्य कारणांमुळे पद रिक्त होईल यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीसाठी निर्माण करण्यास उच्चस्तरीय सचिव समितीने चक्रीय पध्दतीने मान्यता दिली आहे.

**शासन निर्णय :-**

श्री.राजेश शांताराम गायकवाड, पोलीस नाईक/३१६८२,वनराई पोलीस ठाणे,मुंबई यांचे एस-९ (२६४००-८३६००) या वेतनश्रेणीतील वेतन काढण्यासाठी पोलीस नाईक संवर्गातील एक अधिसंख्य पद दिनांक ०६.१०.२०२१ पासून निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२.     सदर अधिसंख्य पद पोलीस आयुक्त बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहे.

३.     सदर पद दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ मधील कलम २०(४) मधील तरतूदीनुसार, श्री.राजेश शांताराम गायकवाड, पोलीस नाईक यांना सेवा संरक्षणासहित सर्व लाभ देण्याकरिता, दिनांक ०६.१०.२०२१ पासून श्री.गायकवाड यांना  दुसरे सुयोग्य पद उपलब्ध होईपर्यंत किंवा त्याच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत निर्माण करण्यात येत आहे. त्यानंतर सदर पद आपोआप संपुष्टात येईल.

४.     सदर पदाच्या वेतन व भत्त्यावरील खर्च हा “ मागणी क्रमांक-बी-१, मुख्यलेखाशीर्ष २०५५-पोलीसउपलेखाशिर्ष-१०८, राज्य मुख्यालय पोलीस(०२) शहर पोलीस(०२)(०१)शहर पोलीस  आस्थापना २०५५००९७-०१(वेतन) ” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५.     सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६०/आपुक,दिनांक ०७.०३.२०२४ अनुसार, उच्च स्तरीय सचिव समितीच्या चक्रीय पध्दतीने घेतलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६.     सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३२११५२९३०६०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

YOGITA SHRIDHAR MALAP

Digitally signed by YOGITA SHRIDHAR MALAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=b7742e8c5c015004bf8a11faf904d3994f1e6c348083fb8212c050bb37fc1382, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C574CC6DF7C7AE23D7188E1018C0E41F16D862FFE8E2E4B4A4B08923E9BDF7A7, cn=YOGITA SHRIDHAR MALAP
Date: 2024.03.21 15:41:11 +05'30'

**( योगिता मालप )**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१.पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२.महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य मुंबई/ नागपूर.
३.महालेखापाल ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर.
४.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६.वित्त विभाग, आ.पु.क. कक्ष मंत्रालय,मुंबई.
७.निवडनस्ती, पोल ५-ब, गृह विभाग, मंत्रालय मुंबई-३२..